राष्ट्रीय कृषी विकास योजना (RKVY)
सन २००९-१० मध्ये शेततळी निर्माण
करण्याची योजना राबविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
**शासन निर्णय क्र. राकृवि-२००९/प्र. क्र. १८/जल-१२**
**मंत्रालय, मुंबई -४०००३२**
**दिनांक :- १८ जून, २०१०**

**वाचा -**

(१) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. राकृवि-२००८/प्र.क्र.१६६/जल-७, दि.३ मार्च,२००८, दि.१० मार्च,२००८, दि.१७ मार्च,२००८, दि.१५ एप्रिल, २००८, दि. १६ जुलै,२००८ व दि. १९ डिसेंबर २००८
(२) शासन निर्णय,नियोजन विभाग,क्र.शेतत/२००९/प्र.क्र.२७१/रोहयो-५, दि. ३१ ऑगस्ट,२००९ व दि. १ जानेवारी, २०१०
(३) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. राकृवि-२००९/प्र.क्र.१८/जल-१२, दि.१ जानेवारी, २०१०., दि. २० जानेवारी, २०१० (शुध्दीपत्रक)
(४) शासन निर्णय, कृषि व पदुम क्र. राकृवि -२००९/प्र.क्र. १०२/रा.कृ.वि.यो., दि. २२ जानेवारी, २०१०.
(५) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. राकृवि-२००९/प्र.क्र.१८/जल-१२, दि.२३ मार्च,२०१०, दि.१६ एप्रिल,२०१० (शासन परिपत्रक) व दि.२३ एप्रिल,२०१० (शासन परिपत्रक)
(६) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. राकृवि-२००९/प्र.क्र.१८/जल-१२, दि.२५ मार्च,२०१०.
(७) संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे यांची पत्र क्र.मृदसं/मृद-४/राकृवियो/शेततळे/निधी/११९५/२०१०, दि.३० मे,२०१० व दि.१५ जून,२०१०.

**प्रस्तावना -**

राष्ट्रीय विकास परिषदेने (NDC) पारित केलेल्या ठराव क्रमांक ५३ नुसार ११ व्या पंचवार्षिक योजनेत ४ टक्के कृषी विकासाचे उदिष्ट ठरविले आहे. हे लक्षात घेऊन केंद्रीय कृषी मंत्रालयाने राष्ट्रीय कृषी विकास योजना (RKVY) जाहिर केलेली आहे. त्यानुसार राज्यात सदर योजनेअंतर्गत वरील संदर्भ क्र. १ मधील दि. ३ मार्च, २००८ च्या शासन निर्णयानुसार सन २००७-०८ पासून शेततळे कार्यक्रम राबविण्यास मंजूरी देण्यात आली आहे. तसेच, सदर शेततळे कार्यक्रम सन २००९-१० मध्ये पुढे सुरु ठेवण्यास वरील संदर्भ क्र.३ मधील दि. १ जानेवारी, २०१० च्या शासन निर्णयानुसार मान्यता देण्यात आली असून यात राज्यातील कापूस उत्पादक व अवर्षण प्रवण क्षेत्र असलेल्या २५ जिल्हयांचा समावेश करण्यात आला आहे. यासाठी एकूण २७००० शेततळे निर्माण करण्याचे उद्दिष्ट निश्चित करण्यात आले आहे.

सदर शेततळे कार्यक्रम राबविण्यास कृषी विभागाच्या वरील संदर्भ क्र. ४ मधील दि. २२ जानेवारी, २०१० च्या शासन निर्णयान्वये रु. १२४.०० कोटी इतका निधी संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यात आला असून, त्यापैकी रु.६२.०० कोटी इतका निधी यापूर्वीच संदर्भ क्र. ६ मधील दि.२५ मार्च,२०१० च्या शासन निर्णयान्वये क्षेत्रिय कार्यालयांना वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. आता उर्वरित शिल्लक रु.६२.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय -**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत सन २००९-१० मध्ये २७००० शेततळयाचे उद्दिष्ट पूर्ण करण्यासाठी एकूण **रुपये १२४.०० कोटी (रुपये एकशे चौवीस कोटी मात्र )** एवढा निधी मंजूर करण्यात आलेला असून कृषि विभागाच्या दि. २२ जानेवारी, २०१० च्या शासन निर्णयान्वये संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यात आला आहे. या निधीतून रु. ६२.०० कोटी इतका निधी संदर्भाधिन दि. २५ मार्च, २०१० च्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आला आहे. आता उर्वरित **रुपये ६२.०० कोटी (रुपये बासष्ट कोटी मात्र)** एवढा निधीचा दुसरा हप्ता वितरित करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२/-

२. तसेच सदर निधी जिल्हानिहाय वितरीत करण्यासाठी संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत असून, संबंधित जिल्हयाला मंजूर केलेला निधी जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या **"आत्मा"** संस्थेच्या स्वतंत्र खात्यात जमा करण्यास शासन मंजूरी देत आहे.

३. सदर अनुदानाच्या वाटपासाठी संदर्भाधिन दि.२५ मार्च, २०१० च्या शासन निर्णयातील परि.२ मधील अटी पूर्वी प्रमाणेच लागू राहतील.

(१) मात्र, त्यातील अट क्र.२ (ड) नुसार शेततळे करिता प्राप्त अर्ज छाननी, जागा पहाणी, जिल्हा समितीद्वारे निवड / मंजूर लाभार्थ्यांची यादी, कार्यारंभ / मंजूरी आदेश, काम पूर्ण झालेल्या शेततळयांची संख्या, अनुदान वितरित केलेल्या लाभार्थ्यांची यादी, पूर्ण झालेल्या शेततळयाचा लाभार्थ्यांसह फोटो इत्यादी प्रत्येक टप्प्यातील माहिती वेबसाईटवर भरल्यानंतर (अपलोड) अनुदान अदा करावयाचे आहे. मात्र, ही सर्व माहीती वेबसाईटवर भरुन वेबसाईटद्वारे कामाची अंमलबजावणी करण्याचे हे प्रथम वर्ष असल्याने व याबाबत काही तांत्रिक अडचणी उद्‌भवत असल्याचे आढळून आले. त्यामुळे पूर्ण झालेल्या कामांचे अनुदान वितरित करण्यास काही तांत्रिक अडचणी उद्‌भवल्या असल्याचे निदर्शनास आले आहे. ही वस्तुस्थिती लक्षात घेता **प्रत्येक टप्प्यातील माहीती वेबसाईटवर भरल्याशिवाय अनुदानाचे वितरण करण्यात येवू नये ही अट पुढील आदेश होईपर्यंत सध्या तात्पुरती शिथिल करण्यास मान्यता देण्यात येत आहे.**

(२) त्यानुसार शेततळयांची कामे पूर्ण झालेल्या परंतु वेबसाईटवरील माहिती भरण्याच्या तांत्रिक अडचणीमुळे ज्या लाभार्थ्यांना अद्याप अनुदान वितरित झालेले नाही, त्यांना अनुदान तात्काळ वितरित करुन भौतिक व आर्थिक उद्दिष्ट पूर्ण करण्याची कार्यवाही तातडीने करण्यात यावी.

(३) शेततळयाचे काम पूर्ण झालेल्या लाभार्थ्यांना अनुज्ञेय अनुदान अदा केल्यानंतर योजनेच्या पारदर्शकतेसाठी सदर योजनेच्या प्रत्येक टप्प्यांची आवश्यक ती सर्व माहिती वेबसाईटवर भरणे बंधनकारक राहील. सदर माहिती वेबसाईटवर भरण्याची कार्यवाही किमान २ महिन्यात पूर्ण करण्यात यावी.

४. दरम्यानच्या कालावधीत सदर योजनेमध्ये अधिक पारदर्शकता आणण्याच्या दृष्टीने व याबाबतची माहिती सर्वांना व्हावी यासाठी या योजनेंतर्गत निवड /मंजूर लाभार्थ्यांची यादी, शेततळयाचे आकारमान, पूर्ण कामे व लाभार्थ्यांना वाटप केलेले अनुदान इत्यादी माहिती ग्रामपंचायत, तालुका कृषि अधिकारी, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी व जिल्हाधिकारी यांच्या कार्यालयात दर १५ दिवसांनी सूचना फलकावर लावणे / प्रसिध्द करणे बंधनकारक राहील. तसेच अधिक व्यापक प्रमाणात लोकांना माहिती व्हावी याकरिता सदर योजनेच्या वरील कार्यवाहीची माहिती जिल्हाधिकाऱ्यांमार्फत स्थानिक वर्तमानपत्रातून प्रसिध्द करण्यात यावी. वरीलप्रमाणे आवश्यक त्या सूचना सर्व संबंधितांना आयुक्त (कृषि) यांनी तात्काळ निर्गमित कराव्यात.

५. शेततळी या योजनेच्या अंमलबजावणीसाठी आवश्यक त्या सुचना यापूर्वीच्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या आहेत. सन २००९-१० चा लक्षांक व योजना राबविण्यासाठी आवश्यक निकष / मार्गदर्शक सूचना दि. १ जानेवारी, २०१० च्या शासन निर्णयात नमूद करण्यात आले आहेत त्याची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी. तसेच योजनेच्या अंमलबजावणी बाबत संबंधित कृषी सहसंचालक, संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे व आयुक्त (कृषी) यांनी नियमित आढावा घ्यावा. योजनेअंतर्गत झालेल्या कामांच्या संदर्भातील भौतिक व आर्थिक उद्दिष्टपूर्तीचा साप्ताहिक प्रगती अहवाल शासनास नियमित सादर करण्यात यावा.

६. यावरील खर्च खालील लेखाशिर्षांतर्गत मंजूर केलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

**"मागणी क्र.डी-९, ४४०१- पीक संवर्धनावरील भांडवली खर्च, (००)(८००) इतर खर्च, (००) (०१) राष्ट्रीय कृषि विकास योजनांतर्गत सहाय्यक अनुदान, (१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना), ५३, मुख्य बांधकामे (४४०१-०४८-१) योजनांतर्गत/दत्तमत"**

३/-

७. सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक **२०१००६१८२००२२३००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**( रेखा भिडे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा. मंत्री (जलसंधारण), यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री,(जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
सर्व मा. मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्यस्तरीय जलसंधारण सल्लागार परिषद.
मुख्य सचिव यांचे सहसचिव, सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव,मंत्रालयीन विभाग
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे,
महासंचालक, कै.वसंतराव नाईक स्वावलंबन मिशन
संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
मुख्य अभियंता,लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर),पुणे
संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
सर्व अधीक्षक अभियंता, पाटबंधारे,
सर्व अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे,(स्थानिक स्तर)
संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई (प्रसिध्दी करीता),
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
सर्व सहसंचालक,सामाजिक वनीकरण वृत्ते,
सर्व मुख्य वनसंरक्षक, / सर्व उपवनसंरक्षक,
सर्व उपायुक्त (विकास),
महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषदेचे सर्व अशासकीय सदस्य,
महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती-जल-१२.